सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत वैशिष्टयपूर्ण बांधकामांना "१) उत्कृष्ट पूल, २) उत्कृष्ट रस्ता व ३)उत्कृष्ट इमारत" पुरस्कार देण्याबाबत-

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक बांधकाम विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : पुरस्कार-१०२४/प्र.क्र.२३/आस्था-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३/०८/२०२४.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१०९५/३२०/आस्था-२, दिनांक १६ ऑक्टोबर,१९९६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१०९५/३२०/(भाग-२) आस्था-२, दिनांक १६ सप्टेंबर,१९९७.

३) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१०९७/१६१/आस्था-२, दिनांक २२ सप्टेंबर,१९९७.

४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. पुरस्कार-१००२/प्र.क्र.२१७/आस्था-२, दिनांक १८ ऑक्टोबर,२००२.

५) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१००८/१०३/आस्था-२, दिनांक २९ जुलै,२००८.

६)शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग,क्रमांक पुरस्कार-१००९/प्रक्र.१७५/आस्था-२, दिनांक १७ फेब्रुवारी,२०११.

७) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१०२२/प्र.क्र.८२/२०२२/ आस्था-२, दिनांक ०२ नोव्हेंबर,२०२२.

८) शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक पुरस्कार-१०२२/प्रक्र.५९/आस्था-२, दि.११ सप्टेंबर,२०२३.

**<u>प्रस्तावना</u>** :-

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दरवर्षी सार्वजनिक बांधकाम विभागातील तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील स्थापत्य, विद्युत, वास्तुशास्त्र या विभागातील गुणवंत अधिकारी व कर्मचारी यांना त्यांनी केलेल्या उत्कृष्ट कामाबद्दल पुरस्कार देऊन गौरविण्यात येते. त्याच धर्तीवर सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत उत्कृष्ट पूल/रस्ता/ इमारत यासाठी पुरस्कार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** : -

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत १) उत्कृष्ट पूल २) उत्कृष्ट रस्ता व ३) उत्कृष्ट इमारत यासाठी प्रतिवर्षी पुरस्कार देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या योजनेचा तपशील सोबतच्या परिशिष्ट (अ) मध्ये नमूद केलेला आहे.

२. या प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.एच-६, २०५९-सार्वजनिक बांधकाम, ८०, सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन, (०१) मुख्य अभियंता (सा.बां.) प्रादेशिक विभाग, मुंबई, (०१) (०१) मुख्य अभियंता, (सा.बां.), प्रादेशिक विभाग, मुंबई, पर्यवेक्षण (अनिवार्य) (२०५९२९५८), १३, कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२३१८२४५३०४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2024.08.23 18:50:33 +05'30'

**सोबत : परिशिष्ट "अ"**

**( पुजा उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव,
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव,
५) मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव,
६) अ.मु.स. (सा.बां.) यांचे स्वीय सहायक,
७) सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक,
८) सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक,
९) महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
१४) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई,
१५) सर्व अधीक्षक अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम मंडळ,
१६) संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१७) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
१८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) कार्यासन (आस्था-२)निवडनस्ती.

## परिशिष्ट "अ"

( शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. पुरस्कार-१०२४/प्र.क्र.२३/आस्था-२, दि.२३/०८/२०२४ चे सहपत्र.)

**विषय : सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत १) उत्कृष्ट पूल २) उत्कृष्ट रस्ता व ३)उत्कृष्ट इमारत यासाठी प्रतिवर्षी पुरस्कार देण्याबाबत-**

...................

**अ) द्यावयाच्या पुरस्काराचे स्वरुपः-**

अ) पुरस्कार हा सन्मानचिन्हाच्या स्वरुपात देण्यात यावा.

ब) संबंधित अधिकारी/कंत्राटदार यांचा प्रशस्तीपत्र देऊन गौरव करण्यात यावा.

**ब) पुरस्कार देण्यासाठी विहित करावयाची कार्यपध्दती :-**

मुख्य अभियंता यांनी त्यांच्या विभागातील १) उत्कृष्ट पूल, २) उत्कृष्ट रस्ता व ३)उत्कृष्ट इमारत या पुरस्कारासाठी निकष पूर्ण करणाऱ्या १ ते ३ प्रकल्पांची शिफारस करावी. मात्र एखादया संवर्गात निकषानुसार शिफारस करण्यायोग्य बांधकाम न आढळल्यास त्या संवर्गातील बांधकामाची शिफारस केलीच पाहिजे असे नाही. मात्र याबाबतचा स्पष्ट उल्लेख शासनाकडे शिफारस करणाऱ्या पत्रात मुख्य अभियंता यांनी करणे आवश्यक आहे.

**क) पुरस्कारांची संख्या :-**

दरवर्षी खालीलप्रमाणे प्रत्येकी १ (एक) असे एकूण ३ (तीन) पुरस्कार देण्यात येतील.

१) उत्कृष्ट पूल

२) उत्कृष्ट रस्ता

३) उत्कृष्ट इमारत

**ड) शासन स्तरावरील पुरस्कारासाठी निवड समिती :-**

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव (सा.बां.) | :- | अध्यक्ष |
| २) | सचिव (रस्ते) | :- | सदस्य |
| ३) | सचिव (बांधकामे) | :- | सदस्य |
| ४) | उप सचिव / सह सचिव (तांत्रिक) | :- | सदस्य |
| ५) | उप सचिव/सह सचिव (आस्थापना) | :- | सदस्य सचिव |

**उपरोक्त समितीच्या शिफारशींवर अंतिम निर्णय/उचित निर्णय अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचेबरोबर विचारविनियम करुन मा. मंत्री (सा.बां.) हे घेतील.**

**इ) सर्वसाधारण निकष-**

१) पुरस्कारासाठी शिफारस करावयाच्या बांधकामाचे अंदाजपत्रक किमान **२५ कोटी किंवा त्यावरील** असावे.

२) कार्यान्वित/चालू प्रकल्पांची शिफारस करण्यात येऊ नये. प्रकल्प पारितोषिकाच्या वर्षात पूर्ण झालेला असावा.

**ई) पुरस्काराचे निकष –**

**पुढीलपैकी किमान ७ बाबींमध्ये पारित असलेला प्रकल्प असावा–**

१) बांधकाम नवीन संशोधन (research) करून किंवा नवतंत्रज्ञानाच्या अथवा नवीन साहित्याच्या सहाय्याने गुणवत्तापूर्वक केलेले असावे.

२) नवीन संकल्पना (Innovative Design) असावी.

३) सदर बांधकाम जनतेस दीर्घकाळ उपयोगी ठरणारे असावे.

४) बांधकाम खर्चातील बचत.

५) परिरक्षणावरील खर्चात बचत.

६) नियोजित वेळेत काम पूर्ण झालेले असणे आवश्यक आहे.

७) प्रत्यक्षात प्रशासकीय मान्यताप्राप्त किंमतीमध्ये किंवा जास्तीतजास्त ५ टक्के अधिक्यापर्यंतच्या किंमतीत प्रकल्पाचे कामकाज पूर्ण होणे आवश्यक.

८) कामासंबंधीत परिक्षणात महालेखापाल व दक्षता मंडळाचे गंभीर आक्षेप नको.

**फ) तांत्रिक निकष–**

**१) उत्कृष्ट पूल २) उत्कृष्ट रस्ता व ३)उत्कृष्ट इमारत**

**अ) उत्कृष्ट प्रकल्प व्यवस्थापन–**

१) प्रकल्पाचा प्रत्येक टप्पा नियोजीत वेळेत पूर्ण करुन संपूर्ण प्रकल्प वेळेत पूर्ण

२)समतोल व संतुलित अंदाजपत्रक.

३) गुणवत्ता व दर्जा याबाबत कोणतीही तडजोड नाही.

४) प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कार्यान्वित केलेला असावा.

**ब) हरित संकल्पन–**

१)नैसर्गिक पर्यावरणाचे रक्षण किंवा संवर्धन करण्यासाठी नवनविन कल्पना/ कार्यपद्धतींचा कुशलतेने वापर.

२) रस्ता दुतर्फा वृक्ष लागवड करुन त्याचे संवर्धन व संगोपन.

**क) आव्हानात्मक परिस्थितीत केलेले कार्य–**

दुर्गम व कठिण नैसर्गिक क्षेत्र, अति उंच किंवा तीव्र उताराचा डोंगराळ भाग, जंगल क्षेत्र, वेगाने वाहणारा जल प्रवाह (विशेषतः पुलांच्या कामांबाबत), दाट लोकवस्तीचा प्रदेश किंवा सीमा क्षेत्र इ. ठिकाणचे प्रकल्प.

**ड) सुरक्षा व्यवस्था-**

१) महामार्गावरील अपघात कमी करण्यासाठी नाविन्यपूर्ण व उल्लेखनीय अशा सुरक्षिततेच्या उपाययोजना.

२) अपघात प्रतिबंधात्मक उपायांमध्ये वाहतुक चिन्हे व रस्त्यांच्या खुणांचा पुरेपुर वापर.

**इ) प्रकल्पाचे सौंदर्य**- प्रकल्पाचा प्रकार, आकार, पोत/रंग, Finishing आणि वापरलेले साहित्य उत्तम दर्जाचे आवश्यक.

**ई) नाविन्यपूर्णता**- प्रकल्पाचे संकल्पन (Design) पूर्णपणे नविन (नाविन्यपूर्ण) आहे अथवा विद्यमान संरचनेत (Structure) बदल करुन बांधकाम करण्यात आले आहे.

**उ) व्यावहारिकता**- वापराच्या दृष्टीने, स्वच्छतेच्या दृष्टीने व देखभालीच्या दृष्टीने सोईस्कर असणे आवश्यक तसेच सुरक्षिततेच्या अनुषंगाने देखील सोईस्कर असणे आवश्यक.

**ऊ) टिकाऊपणा**- प्रकल्पाची गुणवत्ता व टिकाऊपणा उच्च प्रतीची असणे आवश्यक.

**ए) एकात्मिकरण**- संबंधित ठिकणच्या स्थानिक वातावरणात प्रकल्प कशा प्रकारे एकात्मिक झालेला आहे.

**ग) सदर योजना सन २०२४-२५ या वर्षापासून प्रतिवर्षी चालू ठेवण्यात येईल.**

*-*-*-*-*-*-*-*-*